2004081215300700 1 → 1700

बृहन्मुंबईतील राज्य शासनाच्या, राज्य शासनाच्या अधिपत्याखालील निमशासकीय संस्था, त्यांच्या झोपडपट्ट्यांनी व्यापलेल्या जमिनी, झोपडपट्टी पुनर्वसन योजना राबविण्यासाठी भाडेपट्ट्याने देण्याबाबत.

---

महाराष्ट्र शासन,
गृहनिर्माण व विशेष सहाय्य विभाग,
शासन शुध्दीपत्रक क्र.झोपुयो 1095/प्र.क्र.4210/झोपसु-1,
मंत्रालय, मुंबई 400 032, दिनांक 29 एप्रिल, 1997.

वाचा :- शासन निर्णय क्र.झोपुयो 1095/प्र.क्र.4210/झोपसु-1, दिनांक 16.10.1996.

**शासन शुध्दीपत्रक** :- उपरोक्त शासन निर्णयामध्ये अट क्र.4, 5 आणि 8 या रद्द करण्यांत येत असून, त्याऐवजी खाली नमूद केल्याप्रमाणे सुधारीत अट क्र.4, 5 आणि 8 त्या शासन निर्णयाच्या अंतर्भूत करण्यात येत असून, या सुधारीत अटी मुळ शासन निर्णय निर्गमित होण्याच्या दिनांकापासून लागू करण्यास शासन मान्यता देत आहे.

**अट क्रमांक 4** - झोपडपट्टीवासियांच्या पुनर्वसनासाठी बांधल्या जाणा-या इमारतीस देय असलेल्या जमिनीचा भाडेपट्टा, झोपडपट्टी पुनर्विकास प्राधिकरणाने, झोपडपट्टी पुनर्वसन योजना मंजूर केल्यानंतर संबंधित झोपडपट्टीवासियांच्या नियोजित किंवा नोंदणीकृत सहकारी गृहनिर्माण संस्थेस देण्यात येईल.

**अट क्रमांक 5** - खुल्या बाजारात विकण्यासाठी बांधल्या जाणा-या इमारतीस देय असलेल्या जमिनीचा भाडेपट्टा (लीज अॅग्रीमेंट) शासन वेळोवेळी विहित करील अशा अटी व शर्तींच्या अधीन राहून विकासकास झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरणाने झोपडपट्टी पुनर्विकास योजना मंजूर केल्यानंतर देण्यात येईल.

खुल्या बाजारात विकण्यासाठी बांधल्या जाणा-या इमारतीबाबत भोगवटा प्रमाणपत्र विकासकास प्राप्त होताच विकासकाकडून अशा इमारतींमधील सदनिकाधारकांची गृहनिर्माण संस्था/औद्योगिक/व्यापारी संस्था/संघटना नोंदणीकृत होताच त्या संस्थेस/संघटनेस 3 महिन्याच्या कालावधीत या शासन निर्णयाच्या अटी व शर्तीनुसार भाडेपट्टा करार (सब लीज) करुन दिला जाईल.

**अट क्रमांक 8** - हा भाडेपट्टा करार करण्यासंदर्भात झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण केंद्रीभूत संस्था असेल व कराराच्या किंवा त्यांच्या अटी व शर्तींच्या अनुषंगाने काही प्रश्न उपस्थित झाल्यास, त्याबाबतचा निर्णय घेण्याचा अधिकार झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरणाला असावा व त्यांचा निर्णय अंतिम असावा. हे शुध्दीपत्रक महसूल व वन विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.2098, दिनांक 29.4.1997 नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

जयंत देशपांडे
सचिव,
गृहनिर्माण व विशेष सहाय्य विभाग.

प्रती,

मा. राज्यपालांचे सचिव,
मा. मुख्य मंत्र्यांचे सचिव,

मा. मंत्री (गृहनिर्माण) यांचे खाजगी सचिव,
मा. मंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव,
मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव,
मा. राज्यमंत्री (गृहनिर्माण) यांचे खाजगी सचिव,
मा. राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव,
मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई 400 032,
आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका,
प्रधान सचिव, महसूल विभाग, मंत्रालय, मुंबई,
सचिव, गृहनिर्माण व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई,
अप्पर मुख्य सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
मुख्य कार्यकारी अधिकारी, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई 400 051,
उपाध्यक्ष व मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन,
वांद्रे (पूर्व), मुंबई 400 051,
आयुक्त, कोकण विभाग,
जिल्हाधिकारी, मुंबई,
जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर जिल्हा,
अतिरिक्त जिल्हाधिकारी (अतिक्रमणे), मुंबई,
नियंत्रक, अतिक्रमणे व अनधिकृत बांधकामे, मुंबई,
सचिव व प्रशासकीय अधिकारी, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई 400 051,
मुख्य अधिकारी, मुंबई कोंकण, गृहनिर्माण मंडळ,
संचालक, राजीव गांधी झोपडपट्टी सुधार मंडळ,
महालेखापाल, मुंबई-1,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा अधिकारी, मुंबई,
मंत्रालयीन सर्व विभाग,
गृहनिर्माण व विशेष सहाय्य विभागातील सर्व अधिकारी,
झोपसु (निवड नस्ती).